ई-गव्हर्नन्स अंतर्गत सध्या चालू असलेल्या सर्व portals/applications चे security audit देयक अदा करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: ईगव्ह-०२२३/प्र.क्र.०३/ संगणक**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तारीत इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २८ मार्च, २०२४.

**वाचा:-**

आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्र. आशिका/२०२३/ईगव्ह./Sec.audit/१४३/२०९८, दि.२१.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

ई-गव्हर्नन्स अंतर्गत शालेय शिक्षण विभागासाठी विविध Applications, Portal तयार केले आहेत. सदर Applications, Portal सुरु करण्याआधी त्यांचे security audit CyberQ Consulting Pvt.Ltd. यांच्या कडून करुन घेण्यात आले आहे. त्यानुसार, सध्या चालू असलेल्या सर्व portals/applications चे security audit चे देयक आयुक्त, शिक्षण यांनी संदर्भाधीन पत्रान्वये सादर केले आहे. त्याअनुषंगाने करण्यात आलेल्या कामापोटी रु.२,७८,४८०/ (दोन लाख अठ्ठ्याहत्तर हजार चारशे ऐंशी रु फक्त) इतका निधी कंपनीला वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त security Audit च्या कामासाठी देय रु.२,७८,४८०/- (दोन लाख अठ्ठ्याहत्तर हजार चारशे ऐंशी रु फक्त) इतका निधी CyberQ Consulting Pvt.Ltd. या कंपनीस वितरीत करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | देयकाचा तपशिल | देयकाची एकूण रक्कम |
|---|---|---|
| १ | विभागाच्या ई-गर्व्हनन्स अंतर्गत सुरु असलेल्या सर्व portals/applications चे security audit या कामापोटी CyberQ Consulting Pvt.Ltd. यांचेकडून सादर देयक भागविणे. | रु.२,७८,४८०/- |
| | **एकूण** | **रु.२,७८,४८०/-** |

२. सदरचा खर्च मागणी क्रमांक ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८०-सर्वसाधारण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम (२२०२H४५४) ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षातून सन २०२३-२४ च्या उपलब्ध तरतुदीमधून भागविण्यात यावा. यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक व सहायक संचालक, (लेखा) माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका २०१५ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग- २ मधील अनुक्रमांक २७ अ मधील नियम क्र. ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४३४/व्यय-५, दिनांक २६.०३.२०२४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२८१६३५२८९४२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK GULABRAO SAPKAL

Digitally signed by VIVEK GULABRAO SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=55c54ce6c9bede7daecd096d20450a76c60783cb1318374f8764a2da64d548a5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50EDF35541F970C25C79ED803C981C8C9EBC19E27CDBAD124BB5C63AA9962A6B, cn=VIVEK GULABRAO SAPKAL
Date: 2024.03.28 16:45:03 +05'30'

**( विवेक सपकाळ )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा.अ.मु.स. वित्त विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२) मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३) मा.प्र.स.माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर १/२.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर १/२.
८) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
९) निवडनस्ती/संगणक कार्यासन.